२०० खाटांचे स्त्री रुग्णालय, अमरावती येथील फर्निचरच्या कामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२३/प्र.क्र.१८१/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १० ऑगस्ट, २०२३.

**वाचा :**

1) **आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक मुंबई यांचे पत्र क्रमांक : आआसे/कक्ष-३/टे-६/स्त्रीरुअमरावतीफर्निचरकाम/७००८-०९/२३, दिनांक १९.०६.२०२३.**

**प्रस्तावना :**

२०० खाटांचे स्त्री रुग्णालय अमरावती येथील फर्निचरच्या कामाच्या रु.६३७.१८ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

२. २०० खाटांचे स्त्री रुग्णालय अमरावती येथील फर्निचरच्या कामाच्या अंदाजपत्रक सन २०२०-२१ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर फर्निचरच्या कामाचे अंदाजपत्रक उप अभियंता, (स्थापत्य) सार्वजनिक बांधकाम उप विभाग-१, अमरावती यांनी तयार केले आहेत; कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती तसेच अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ अमरावती; व जिल्हा शल्य चिकित्सक, अमरावती, मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग अमरावती यांनी प्रमाणित केले आहे. त्यानुसार रुपये ६३७.१८ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती** :-

1) शासन निर्णय उदयोग उर्जा व कामगार विभाग दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ अन्वये वस्तू व सेवा खरेदीसाठी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GEM) याची कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचनांनुसारच निविदेची कार्यवाही करण्यात यावी”

२) सदर फर्निचरची गुणवत्ता व आवश्यक संख्या तपासणी करणे व त्यानंतर सदर पुरवठादाराचे देयके अदा करण्यास मान्यता देण्याची जबाबदारी जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील.

३) कामासाठी निविदा मागविण्यापूर्वी सदर कामास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

४) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

६) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्यात्या- भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांची मान्यता घेण्यात यावी.

७) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

८) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

९) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अ.क्र. १ ते ९ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करण्याची जबाबदार संबंधित कार्यकारी अभियंता तसेच जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील.

३. २०० खाटांचे स्त्री रुग्णालय अमरावती येथील फर्निचरच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल.

४. २०० खाटांचे स्त्री रुग्णालय अमरावती येथील फर्निचरच्या कामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

५. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०९१६५८३५६९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: CN = ASHOK MAROTI ATRAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH DEPARTMENT
Date: 2023.08.10 11:36:03 +05'30'

**( अशोक आत्राम )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
६. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णलय, अमरावती.
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
९. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, अमरावती.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. अमरावती.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-३).